केद्र पुरस्कृत योजना सन २०१९-२०
"व्याघ्र प्रकल्प" योजनांतर्गत मेळघाट व्याघ्र प्रकल्पाकरीता निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०१.२०/प्र. क्र. ३४/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- ०६ मार्च, २०२०.

वाचा :-

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक :- ०१.०४.२०१८.
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक :- ०८.०७.२०१९.
३. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ४-१ (१०)/२०११-पीटी, दिनांक १०.०७.२०१९.
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७१९/प्र.क्र.२०२/फ-१, दिनांक ०२.०८.२०१९.
५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७१९/प्र.क्र.२२२/फ-१, दिनांक १७.१०.२०१९.
६. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ४-१ (१०)/२०१९-पीटी, दिनांक २७.१२.२०१९.
७. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ४-१ (१०)/२०१८-पीटी, दिनांक १४.०१.२०२०.
८. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/सी/यो/प्र.क्र. १०/MTR/१६०१/१९-२०, दिनांक २२.०१.२०२०.

प्रस्तावना :-

सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत योजना-व्याघ्र प्रकल्प अंतर्गत मेळघाट व्याघ्र प्रकल्पाच्या विकासाकरीता केंद्र शासनाने संदर्भीय पत्र क्रमांक ३ व ६ अन्वये सर्वसाधारण घटक, अनुसुचित जाती उपयोजना व आदिवासी क्षेत्र उपयोजना अंतर्गत आवर्ती व अनावर्ती बाबींकरीता एकूण रु. १८९१.५० लक्षचे कार्यबाबींस मंजूरी प्रदान केलेली आहे.

२. आता संदर्भ क्रमांक ७ च्या पत्रान्वये केंद्रिय पर्यावरण, वन व हवामान बदल मंत्रालय, नवी दिल्ली यांनी सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत योजना-"व्याघ्र प्रकल्प" योजनेअंतर्गत मेळघाट व्याघ्र प्रकल्पातील मालुर गावातील ३०३ कुटुंबांचे पूनर्वसनाकरीता रु. ३०३०.०० लक्षचा अतिरीक्त वार्षिक प्रवर्तन अहवाल मंजूर केला असून केंद्र हिस्स्याअंतर्गत

रु. १०९०.०० लक्ष निधी वितरीत केला आहे. त्या अनुरुप राज्य हिस्स्याअंतर्गत रु. ७२७.०० लक्ष निधी वितरीत करणे अपेक्षित आहे.

**<u>शासन निर्णय</u>**

सबब आता सदर शासन निर्णयान्वये **रु. १८१७.०० लक्ष** संदर्भ क्रमांक ७ च्या पत्रान्वये केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांनी मान्यता दिलेल्या कार्यबाबींवर खर्च करण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) व्याघ्र प्रकल्प या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत नवेगाव-नागझिरा व्याघ्र प्रकल्पाच्या विकासासाठी होणारा खर्च I) अनावर्ती बाबींसाठी केंद्र हिस्सा ६०% करीता रु. १०९०.०० लक्ष लेखाशिर्ष क्र. २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना (००)(०४) व्याघ्र प्रकल्प (६० % केंद्रीय अनुदान) (२४०६ १२४३). II) त्या अनुरुप राज्य शासनाचा राज्य हिस्सा ४० % करीता रु. ७२७.०० लक्ष लेखाशिर्ष क्र. २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना (००)(२१) व्याघ्र प्रकल्प (४० % राज्य हिस्सा) (२४०६ ए१०२) सन २०१९-२०२० मध्ये अर्थसंकल्पित वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

आ) वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

इ) प्रस्तावित असलेल्या मोठया बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील.

ई) वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे, वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०१९ व दिनांक ०८.०७.२०१९ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

ऊ) प्रस्तुत प्रकरणी केंद्र शासनाचा हिस्सा व राज्य शासनाचा हिस्सा मधील अंतर्भूत १० % Flexi Fund **बाबत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करावी**.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०१९ व दिनांक ०८.०७.२०१९ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३०६११५३०३८४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL DESHBHRATAR

Digitally signed by SWAPNIL DESHBHRATAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, postalCode=400037, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=ce420aedd83773a67f861ab4c751835b3c5119f8fc41f2f3aa39bd7749dc02e0, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL DESHBHRATAR
Date: 2020.03.06 11:55:40 +05'30'

**( स्वप्निल देशभ्रतार )**
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
५. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).